सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून राजा राममोहन रॉय प्रतिष्ठानासाठी अंशदान (योजनेतर) योजनेकरीता निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - मराग्रं २५१७/(प्र. क्र.१८२/१६)/साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ मार्च, २०१७

**वाचा :** १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ ३,दिनांक २०.०४.२०१६.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे पत्र क्र लेखानु-२०१६/प्र.क्र.४४/साशि १, दि. २०.०४.२०१६
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासननिर्णय क्र. २५१७/१८२/१६/साशि ५, दि. २९.०९.२०१६
४) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.३२/२०१६-१७/१४२०८-२०९, दिनांक २५.०१.२०१७
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं - २०१७/प्र.क्र. ८९/अर्थ -३, दि ०८.०२.२०१७

**प्रस्तावना:** -

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकता, समान निधी योजनेसाठी राज्य शासनाचे अंशदानासाठी रुपये २.५० कोटी इतकी रक्कम सन २०१६-१७ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. १ नुसार अर्थसंकल्पीत निधी खर्च करण्याची मर्यादा ८०% एवढी विहित करण्यात आलेली आहे. राजा राममोहन रॉय प्रतिष्ठानच्या योजनेसाठी रुपये २.०० कोटी ( रुपये दोन कोटी फक्त) निधी संदर्भ क्र . ३ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला आहे.

ग्रंथालय संचालनालयाने संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये उर्वरित २० % निधीची मागणी केली होती. तथापि संदर्भ क्र.५ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकानुसार योजनेतर निधी खर्च करण्याची मर्यादा ९० % असल्यामुळे १० % निधी रु. २५,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस लाख फक्त) रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकता, समान निधी योजनेसाठी सन २०१६-१७ करिता राज्य शासनाचे अंशदानासाठी रुपये २.५० कोटी ( रुपये दोन कोटी पन्नास लाख फ़क्त) मंजूर करण्यात आलेला आहे. संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये रु. २.०० कोटी निधी वितरीत करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या दि. ०८/०२/२०१७ च्या शासन परिपत्रकानुसार सदर योजनेसाठी ९० % निधी वित्त विभागाने बीडीएसवर उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर लेखाशीर्षाखाली १०% निधी रुपये २५,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस लाख फ़क्त) निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. २०/०४/२०१६ च्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे. सदरचा खर्च करण्यासाठी ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा निधी मागणी क्रमांक डब्ल्यू-४, २२०५-कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०२) राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानासाठी अंशत (२२०५ ०३०४) (योजनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली चालु वर्ष २०१६-१७ करीता उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच या अनुदानाच्या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे ग्रंथालयांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०३१७१११७२३८९०८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Suvarna Hemchandra Patankar

Digitally signed by Suvarna Hemchandra Patankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Edu, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed71ebecc5e77faa2bc326ad6465ee69e8ce4b095cb873186b176c646b34cc28, serialNumber=3740f7b9e520ea4fc9d0c8cae45a7132db5b499301d6caff46360639be7adc8b, cn=Suvarna Hemchandra Patankar
Date: 2017.03.17 11:19:42 +05'30'

**( सु. हे. पाटणकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / नागपूर
३. ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
५. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
६. अ.मु.स (उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक
७. अवर सचिव (साशि १) मंत्रालय
८. निवडनस्ती (साशि-५).